जलसंपदा विभागामार्फत उभारणी व कार्यान्वित केलेल्या व महानिर्मिती कंपनीकडे हस्तांतरीत केलेल्या ३५ वर्ष आयुर्मान पूर्ण झालेल्या जलविद्युत प्रकल्पांचे नूतनीकरण व आधुनिकीकरण करुन परिचालन करणेसाठी पुन्हा जलसंपदा विभागाकडे हस्तांतरणाबाबत.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्र. जविप्र२०२१/प्र.क्र.१०५/जवि**

नवीन प्रशासन इमारत, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १६.११.२०२१

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यात जलविद्युत प्रकल्पांची उभारणी जलसंपदा विभागांतर्गत कार्यरत असलेल्या जलविद्युत संघटनेमार्फत करण्यात येत असून, प्रचलित कार्यनियमावली नुसार हे प्रकल्प उभारणीनंतर भाडेपट्टी तत्वावर परिचलन व देखभालीसाठी महानिर्मिती कंपनीकडे हस्तांतरीत करण्यात येतात. यानुसार २७ जलविद्युत प्रकल्प (स्थापित क्षमता- २५९२.७५ मेगावॅट) महानिर्मिती कंपनीकडे ३५ वर्षाकरिता भाडेपट्टीने हस्तांतरीत करण्यात आलेले आहेत. विद्युतअधिनियम २००३ नुसार वीजनिर्मिती क्षेत्र परवाना मुक्त करण्यात आले. यास्तव जलसंपदा विभागाने २५ मे.वॅ. स्थापित क्षमतेपर्यंतच्या जलविद्युत प्रकल्पांच्या खाजगीकरणातून विकसनाचे धोरण शासन निर्णय दि.१५.०९.२००५ अन्वये जाहीर केले आहे.

विद्युत अधिनियम २००३ मधील तरतूदीनुसार तत्कालीन महाराष्ट्र राज्य वीज मंडळाचे (MSEB) त्रिभाजन होऊन महावितरण, महापारेषण व महानिर्मिती या तीन स्वतंत्र कंपन्या अस्तित्वात आल्या तसेच महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाची (MERC) देखील स्थापना झाली. त्यामुळे जलविद्युत प्रकल्पातून होणाऱ्या वीजनिर्मिती पासून योग्य महसूली रक्कम राज्य शासनास प्राप्त होणे आवश्यक असल्यामुळे जलसंपदा विभागाने महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाकडून भाडेपट्टीची सुधारित रक्कम आयोगाच्या दि.२७.१०.२००८ रोजीच्या आदेशाद्वारे निश्चित केलेली आहे. सदर आदेशानुसार वीर व भाटघर जलविद्युत प्रकल्पाचे नियत ३५ वर्षाचे आयुर्मान पूर्ण झाल्यामुळे भाडेपट्टी मिळणे बंद झाली असल्याने, सदर प्रकल्प जलसंपदा विभागाकडे परत घेण्याचा निर्णय तत्कालीन मा. मंत्री (जलसंपदा व ऊर्जा) यांचे मान्यतेने सन २०१० साली झालेला आहे. तसेच सदर प्रकल्प जलसंपदा विभागाकडे परत हस्तांतरीत करण्यासंदर्भात महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग यांच्याकडे मार्गदर्शनार्थ दाखल याचिकेनुसार सदर प्रकल्पाची मालकी जलसंपदा विभागाची असल्याने, जलसंपदा विभागाने याबाबत निर्णय घ्यावा, असे आयोगाने दि.१४.१२.२००९ रोजीच्या आदेशात नमूद केले आहे. त्यानुसार वीर जलविद्युत प्रकल्प ऊर्जा विभागाकडून हस्तांतरीत करुन घेण्यात आला असून, सदर प्रकल्प नुतनीकरण व आधुनिकीकरण (R & M) करणे व त्यानंतर परिचलनाकरिता BOT तत्वावर खाजगी प्रवर्तकास देण्यात आला आहे. यामुळे

शासनास Project Residual Cost + Intake Structure Cost करिता Threshold Premium व Upfront Premium द्वारे एकरकमी महसूल तसेच पाणी वापर स्वामित्व शुल्क व १३% free Power करिता रु.३.७५ प्रति युनिट दराने येणारी रक्कम इतका महसूल प्रति वर्ष प्रमाणे भाडेकरार कालावधीत प्राप्त होणार आहे.

महाराष्ट्र राज्यातील जलसंपदा विभागांतर्गत कार्यरत असणाऱ्या पाच पाटबंधारे विकास महामंडळांसाठी सन १९९६ ते १९९८ या कालावधीत अधिनियमांद्वारे कार्यपध्दती निश्चित केली असून, जलविद्युत वीज प्रकल्प (कोयना व घाटघर जलविद्युत वीज प्रकल्प वगळून) ऊर्जा निर्मितीच्या योजना आखणे, त्यांचे अन्वेषण करणे, संकल्पचित्र, बांधकाम करणे आणि व्यवस्था पाहणे ही कामे त्यांचेकडे सोपविण्यात आलेली आहेत. जलसंपदा विभागामार्फत उभारणी व कार्यान्वित केलेले व महानिर्मिती कंपनीकडे हस्तांतरीत केलेले ३५ वर्ष आयुर्मान पूर्ण झालेले येलदरी (३x७.५ मेगावॅट), वैतरणा (१x६० मेगावॅट), भाटघर (१x१६ मेगावॅट), कोयना धरण पायथा (२x२० मेगावॅट), कोयना स्तर§III (४x८० मेगावॅट), पैठण (जायकवाडी) (१ x १२ मेगावॅट) हे जलविद्युत प्रकल्प नूतनीकरण व आधुनिकीकरण करणेसाठी पुन्हा जलसंपदा विभागाकडे हस्तांतरीत करून घेणेबाबत तसेच जलविद्युत प्रकल्पांच्या भविष्यातील सु:स्थितीत कार्यन्वयाच्या दृष्टीने तसेच त्यांचे नूतनीकरण व आधुनिकीकरण करण्यासाठी विहीत आयुर्मान पूर्ण झालेल्या व महाजेनेकोकडून भाडेपट्टी येणे बंद झालेल्या जलविद्युत प्रकल्पांचे वीर जलविद्युत प्रकल्पाच्या धर्तीवर "नूतनीकरण व आधुनिकीकरण करणे व त्यानंतर परिचलन करणे" या एकत्रित व्याप्तीनुसार BOT तत्वावर निविदा मागवून प्रवर्तक निश्चिती करणे संयुक्तिक राहील. सदर प्रस्तावास मा. मंत्री जलसंपदा यांनी मान्यता दिलेली असून, सद्य:स्थितीत महाजेनेकोकडे हस्तांतरीत केलेल्या व ३५ वर्षांचे नियत आयुर्मान पूर्ण होऊन भाडेपट्टी मिळणे बंद झालेल्या प्रकल्पांबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय:**

१. जलसंपदा विभागाच्या मालकीचे व नियत ३५ वर्षाचे आयुर्मान पूर्ण झालेल्या खालील नमूद सहा जलविद्युत प्रकल्प महाजनकोकडून संबंधित पाटबंधारे विकास महामंडळांकडे /जलसंपदा विभागाकडे हस्तांतरीत करुन घेण्यात येत आहेत. या प्रकल्पांचे आधुनिकीकरण/दुरुस्ती व परिचलन संबंधित पाटबंधारे महामंडळ/ जलसंपदा विभाग करेल. यासाठी खाजगी प्रवर्तकाची नेमणूक स्पर्धात्मक निविदाद्वारे करण्यात येईल. जलविद्युत प्रकल्पांचे समन्वय साधक अधिकारी मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई यांनी महानिर्मिती कंपनीकडून ह्या जलविद्युत प्रकल्पांच्या मागील दहा वर्षातील वीजनिर्मितीचा तपशील, संकल्पित वीज निर्मितीपेक्षा कमी/जास्त झालेल्या वीज निर्मितीबाबत कारणमिमांसा, जनित्र-संयंत्र आणि अनुषंगिक सहाय्यकारी विद्युत उपकरणांमध्ये महानिर्मिती कंपनीने केलेल्या किरकोळ/मुख्य दुरुस्तीचा तपशील, प्रकल्प महानिर्मिती कंपनीस हस्तांतरित करतेवेळी महानिर्मितीस दिलेली रेखाचित्रे, प्री-कमिशनिंग/कमिशनिंग टेस्ट रेकॉर्ड, उपकरणे/साधनसामग्री/सुटेभाग यांची सूची व सद्यस्थितीत प्रकल्पस्थळी उपलब्ध असलेली उपकरणे/साधनसामग्री/सुटे भाग यांची सूची इ.

माहिती प्राप्त करून घ्यावी. यापैकी उपलब्ध होणाऱ्या माहितीचा समावेश निविदा दस्तावेजात करावा.

जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र जविप्र २०२१/प्र.क्र.४५/२१/जवि, दिनांक २७.१०.२०२१ अन्वये स्थापन केलेल्या समितीच्या कार्यकक्षा मुद्दा क्र. २ नुसार समितीने शिफारस केल्यानुसार निविदा मसुदा तयार करून निविदा प्रक्रिया मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई यांचे अधिपत्याखाली पूर्ण करावी. निविदा प्रक्रिया पूर्ण करून प्रवर्तकासोबत करारनामा संबंधित स्थापत्य मुख्य अभियंता यांचे मार्फत स्वाक्षांकित करण्यात येईल.

प्रवर्तकामार्फत Threshold Premium व Upfront Premium भरून झाल्यानंतर प्रकल्प संबंधित स्थापत्य मुख्य अभियंता मार्फत/ प्रत्यक्ष ताब्यात घेण्याबाबत महानिर्मिती कंपनीस पंधरा दिवसांची आगाऊ सूचना देण्यात येईल. त्यानुसार संबंधित जलविद्युत विभागामार्फत निवड झालेल्या प्रवर्तकाकडे प्रकल्प हस्तांतरीत करण्याची प्रत्यक्ष कार्यवाही महानिर्मिती कंपनीने पूर्ण करावी. ग्रीडच्या संतुलनासाठी जलविद्युत निर्मिती आवश्यक असल्यामुळे जलविद्युत प्रकल्पाची वीजनिर्मिती खंडीत न होण्याकरिता महानिर्मिती कंपनीकडून प्रवर्तकाकडे प्रकल्प हस्तांतरीत करण्यात येईल.

भाटघर जलविद्युत प्रकल्पाचे जलसंपदा विभागाकडे हस्तांतरणाचा निर्णय सन २०१० साली झाला असल्याने प्रथमत: भाटघर जलविद्युत प्रकल्पाबाबत कार्यवाही करण्यात यावी व तदनंतर वेळोवेळी शासन निर्देशानुसार इतर प्रकल्पांबाबत कार्यवाही करावी. कोयना संकुलातील जलविद्युत प्रकल्पांबाबत करावयाच्या कार्यवाहीबाबत स्वतंत्रपणे कळविण्यात येईल.

| अ.क्र. | जलविद्युत प्रकल्पाचे नांव | कार्यान्वितीकरण दिनांक | स्थापित क्षमता मेगावॅट | महानिर्मितीकडे हस्तांतरीत केल्याची तारीख |
|---|---|---|---|---|
| १) | येलदरी ज.वि.प्र. | संच-१-१६.६.१९६८<br>संच-२-१०.५.१९६८<br>संच-३-२०.३.१९६८ | ३x७.५ | जानेवारी,१९६९ |
| २) | वैतरणा ज.वि.प्र. | २६.६.१९७६ | १x६० | जून, १९७७ |
| ३) | भाटघर ज.वि.प्र. | २.८.१९७७ | १x१६ | फेब्रुवारी, १९७८ |
| ४) | कोयना स्तर-III | जुलै,१९७५ ते ऑक्टोबर,१९७८ | ४x८० | नोव्हेंबर,१९७७ |
| ५) | कोयना धरण पायथा ज.वि.प्र. | संच-१-३०.१०.१९८०<br>संच-२-१६.०३.१९८१ | २x२० | सप्टेंबर,१९८२ |
| ६) | पैठण (जायकवाडी) जलविद्युत प्रकल्प | नोव्हेंबर, १९८४ | १ x १२ | ऑगस्ट, १९८७ |

२. ३५ वर्षाच्या कालावधीत महानिर्मिती कंपनीने त्यांना हस्तांतरीत केलेल्या सर्व प्रकल्पांची जलसंपदा विभागास देय असलेली रक्कम तात्काळ अदा करावी. तसेच ३५ वर्षानंतरच्या

कालावधीसाठी वीर जलविद्युत प्रकल्पातून खाजगी प्रवर्तकाने दिलेल्या देकाराच्या धर्तीवर सर्व रक्कम महानिर्मिती कंपनीने जलसंपदा विभागास अदा करावी, कारण ही रक्कम घेतांना प्रकल्पावर करावयाच्या नुतनीकरणाचा खर्च विचारात घेऊन खाजगी प्रवर्तकाने देकार दिला आहे.

प्रकल्पनिहाय देय रक्कम मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंपदा विभाग, मुंबई यांचे मार्फत महानिर्मिती कंपनीस कळविण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२११११६१२२५१२५८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajnish
Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, serialNumber=293016b5f13cd03f75c9f34c66d956309c8b3cd5faf07931d817577e6116e436, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2021.11.16 12:31:01 +05'30'

**(र.रा.शुक्ला)**
**मु.अ. (जसं) व सह सचिव**

**प्रत :**

१. मा. मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव,
२. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव,
३. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
४.प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
५.सचिव (लाक्षेवि व जसंव्य) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (प्रकल्प समन्वयक) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
८.कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
९. कार्यकारी संचालक, गोदावरी पाटबंधारे विकास महांमडळ, औरंगाबाद
१०.कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
११.कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१२.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
१३. मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई,
१४.अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे
१५. जलविद्युत कार्यासन संग्रहार्थ.